२०१००६३०१४४१३६००१

संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर या प्रशिक्षण संस्थेस अनुदान वितरीत करण्याबाबत...
**(दुसरा हप्ता जून ते सप्टेंबर २०१०)**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय.क्र.अनुसं-२०१०/प्र.क्र. ७७/योजना-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- २८ जून, २०१०.

**पहा** :- १. शासन परिपत्रक क्र.आरसीएन १०८९/प्र.३०२७/२८, दि.५ सप्टेंबर १९९०
२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.क्र.प्रशिक्षण २०९३/प्र.८४५/०९, दिनांक १७ सप्टेंबर, १९९३
३. शासन परिपत्रक.ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. प्रशिक्षण ११९८/प्र.क्र.५८१/६१, दि.२३ सप्टेंबर, १९९८.
४. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र. ८५९/४४, दिनांक १२ जून, २००१
५. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.क्र.अनुंस २०१०/प्र.क्र. ७७/१०, दिनांक १७ मे, २०१०

**शासन निर्णय:-**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता **मागणी क्र. एल-३, "२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम"** (०१) (०२) श्री. मौनी विद्यापीठाच्या विद्यमाने संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी येथे संयुक्त प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्याची योजना **संकेतांक क्रमांक (२५१५ ००२ ६)** या लेखाशिर्षाखाली **'संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर'** या प्रशिक्षण केंद्रासाठी एकूण रुपये ४९,२९,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. यामध्ये वेतन व वेतनेतर खर्चाचा समावेश आहे.

| प्रशिक्षण केंद्राचे नांव | वेतन | वेतनेतर | एकूण तरतूद |
|---|---|---|---|
| संयुक्त प्रशिक्षण केंद्र गारगोटी, जि.कोल्हापूर | ४२,२९,०००/- | ७,००,०००/- | ४९,२९,०००/- |

उपरोक्त वेतनेतर खर्चामध्ये प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, पाहुणे व्याख्याता मानधन, भोजन भत्त्यावरील खर्च इत्यादी बाबींचा समावेश होतो.

२. सन २०१०-११ या आर्थिक वर्षाच्या जून ते सप्टेंबर २०१० या चार महिन्यांच्या कालावधीतील स्थायी खर्च भागविण्यासाठी वित्त विभागाने आर्थिक वितरण प्रणालीवर (BDS) उपलब्ध करून

दिलेल्या रुपये १५,३४,०००/- अनुदानाची रक्कम संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी या संस्थेसाठी चार महिन्यांसाठी खालील प्रमाणे वितरित करण्यात येत आहे.

| प्रशिक्षण केंद्राचे नांव | दुसऱ्या हप्त्याचे वितरण ( रुपये हजारात ) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | **जून, २०१०** | | **जुलै, २०१०** | | **ऑगस्ट, २०१०** | | **सप्टेंबर, २०१०** | |
| | वेतन | वेतनेतर | वेतन | वेतनेतर | वेतन | वेतनेतर | वेतन | वेतनेतर |
| संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी | **३४३** | **६२** | **३४६** | **५८** | **३४६** | **५८** | **३१५** | **५६** |

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषगाने उपायुक्त (आस्था), विकास शाखा, पुणे विभाग, पुणे यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भात दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. **विभागीय आयुक्त कार्यालयाने अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे ही बाब विचारात घेऊन त्यांच्या कार्यालयाचे आदेश निर्गमित करावेत. मात्र सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच संयुक्त प्रशिक्षण केंद्रांची खर्चाची व उद्दिष्टपूर्तीबाबतची माहिती विभागीय आयुक्त, पुणे कार्यालयाने शासनास दरमहा सादर करावी.**

५. हा खर्च **मागणी क्र.एल-३, "२५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम" ००३ प्रशिक्षण ०१ (०२) श्री मौनी विद्यापीठाच्या विद्यमाने गारगोटी येथे संयुक्त प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्याची योजना (संकेतांक क्र. २५१५ ००२ ६) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ३५, सहाय्यक अनुदाने (वेतन)** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो यावर्षी त्या लेखाशिर्षातंर्गत केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच उपलेखाशिर्षाखाली पडतो आहे, याबाबतचा ताळमेळ घालून त्याचा एकत्रित अहवाल **विभागीय आयुक्तांनी** शासनास सादर करावा.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

७. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग-३ मधील अ.क्र.१ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( संजय गांगुर्डे )
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई. (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता)
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर. (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता)
३. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (दोन प्रती)
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५.महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
६.संचालक श्री.मौनी विद्यापीठ गारगोटी, जि.कोल्हापूर
७.प्राचार्य,संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर
८.वित्त विभाग (का.क्र.अर्थसंकल्प-१६/व्यय १५)
९.कार्यासन.क्र.वित्त-१,वित्त-६, वित्त-७, वित्त-८, योजना-७, ग्रा.वि.वज.सं.विभाग(२ जादा प्रतीसह)
१०.निवड नस्ती का.क्र.योजना-४